भारतरत्न लता दीनानाथ मंगेशकर आंतरराष्ट्रीय संगीत महाविद्यालय आणि संग्रहालयाकरिता नवीन इमारतीचे बांधकाम करण्याच्या अनुषंगाने राबविण्यात आलेल्या कल्पना स्पर्धातील (Ideas Design Competition) विजेते घोषित करून त्यांच्या पारितोषिकास मान्यता देण्याबाबत.

महाराष्ट्र शासन
उच्च व तंत्रशिक्षण विभाग
शासन निर्णय क्रमांक :एडीआर २०२३/प्र.क्र.५१ /तांशि-६
मंत्रालय विस्तार भवन, मादाम कामा मार्ग,
हुतात्मा राजगुरु चौक, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक :- १८ ऑगस्ट,२०२३.

<u>वाचा</u> :- १) शासन निर्णय क्रमांक अेडीआर-२०२२/प्र.क्र.२५/तांशि-६, दिनांक १६ मार्च, २०२२
२) जिल्हाधिकारी,मुंबई उपनगर यांचे पत्र क्र ३अ/कावि५१८/२०२३,दि.३१ मार्च,२०२३
३) शासन निर्णय क्रमांक अेडीआर-२०२३/प्र.क्र.५१ /तांशि-६, दिनांक १९ मे, २०२३
४) मुख्य अभियंता,सार्वजनिक बांधकाम विभाग प्रादेशिक विभाग, मुंबई यांचे पत्र क्र. मुअ/मुमं (मुं)/निविदा /६०/२०२३, दि.१७ जुलै, २०२३.

**<u>प्रस्तावना</u> :-**

भारतरत्न लता दीनानाथ मंगेशकर आंतरराष्ट्रीय संगीत महाविद्यालय आणि संग्रहालय स्थापन करण्यास तसेच सदर महाविद्यालयासाठी ग्रंथालय संचालनालयाची कालीना संकूल येथील जागा निश्चित करण्यास संदर्भ क्र १ येथील दिनांक १६ मार्च,२०२२च्या शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात आली आहे. त्यास अनुसरून जिल्हाधिकारी, मुंबई उपनगर यांनी संदर्भ क्र २ येथील दिनांक ३१ मार्च, २०२३च्या आदेशान्वये कलीना संकुल येथील ७००० चौ.मी. इतकी खुली जमीन "भारतरत्न लता दीनानाथ मंगेशकर आंतरराष्ट्रीय संगीत महाविद्यालय आणि संग्रहालय" स्थापन करण्याकरिता कला संचालक, कला संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांना हस्तांतरित केली आहे. भारतरत्न लता दीनानाथ मंगेशकर आंतरराष्ट्रीय संगीत महाविद्यालय आणि संग्रहालय यासाठी शासनाने दिलेल्या ७००० चौ.मी.जमिनीवर सुसज्ज अशी नवीन इमारत उभी करण्याचे नियोजित आहे. याकरिता देशातील नामांकित वास्तुविशारदांची/ वास्तुशास्त्र संस्थांची कल्पना स्पर्धा (Ideas Design Competition) सार्वजनिक बांधकाम विभागाकडून राबविण्यात आली आहे. सदर कल्पना स्पर्धा( Ideas Design Competition) मध्ये सादर करण्यात येणाऱ्या डिझाईन मधून एक डिझाईन अंतिम करण्यासाठी दि.१९ मे, २०२३च्या शासन निर्णयान्वये समिती गठित करण्यात आली असून कल्पना स्पर्धातील (Ideas Design Competition) विजेते घोषित करून त्यांच्या पारितोषिकास तसेच, यापैकी एका स्पर्धकास /विजेत्यास भारतरत्न लता दीनानाथ मंगेशकर आंतरराष्ट्रीय संगीत महाविद्यालय आणि संग्रहालयाच्या नवीन इमारतीचे बांधकाम करण्याच्या अनुषंगाने सविस्तर नकाशे, आराखडे बनविणे व अंदाजपत्रक तयार करणे हे काम देण्याच्या प्रस्तावास मान्यता देण्याबाबतची बाब शासनाच्या विचाराधीन होती. त्यानुसार पुढीलप्रमाणे निर्णय घेण्यात आला आहे.

**शासन निर्णय :-**

भारतरत्न लता दीनानाथ मंगेशकर आंतरराष्ट्रीय संगीत महाविद्यालय आणि भारतरत्न लता दीनानाथ मंगेशकर संग्रहालय यासाठी कलीना संकुल, (कोलेकल्याण) सांताक्रुझ, ता.अंधेरी, जि.मुंबई उपनगर येथील न.भू.क्र.४०९४/१, क्षेत्र १६१८८ चौ.मी. जमिनीपैकी ७००० चौ.मी.जमिनीवर सुसज्ज नवीन इमारत उभी करण्यात येणार आहे. या इमारतीची संभाव्य रचना निश्चित करण्यासाठी देशातील नामांकित वास्तुविशारदांची/ वास्तुशास्त्र संस्थांची कल्पना स्पर्धा (Ideas Design Competition) सार्वजनिक बांधकाम विभागाकडून आयोजित करण्यात आली. या कल्पना स्पर्धेमध्ये सादर करण्यात येणाऱ्या डिझाईन्स मधून एक डिझाईन अंतिम करण्यासाठी दिनांक १९ मे, २०२३ च्या शासन निर्णयान्वये गठीत करण्यात आलेल्या समितीने स्पर्धकांना प्रदान केलेल्या गुणांबाबतचा तक्ता/मूल्यांकन अहवालानुसार खालील व्यक्ती/संस्था यांना त्यांना मिळालेल्या गुणांच्या आधारे प्रथम, द्वितीय व तृतीय बक्षीस घोषित करण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे.

| क्रमांक | Participant Code | गुण |
|---|---|---|
| प्रथम | ९६४८०११४८ | ९०/१०० |
| द्वितीय | २१७१९७३५० | ८०/१०० |
| तृतीय | ५१०२३१२९ | ७५/१०० |

२. दिनांक १९ मे, २०२३ च्या शासन निर्णयान्वये गठीत करण्यात आलेल्या समितीने घोषित केलेल्या प्रथम विजेत्यास रुपये २ लाख, द्वितीय विजेत्यास रुपये १.५० लाख व तृतीय विजेत्यास रुपये १ लाख बक्षीस तसेच सादरीकरण केलेल्या इतर ६ स्पर्धकांना प्रत्येकी रू ५०,०००/- इतका प्रोत्साहन भत्ता सार्वजनिक बांधकाम विभागामार्फत देण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे.

३. भारतरत्न लता दीनानाथ मंगेशकर आंतरराष्ट्रीय संगीत महाविद्यालय व संग्रहालय इमारतीचे बांधकाम करण्याच्या अनुषंगाने सविस्तर नकाशे-आराखडे बनविणे, अदांजपत्रक तयार करणे , इ. काम करून घेण्यासाठी कोणत्या स्पर्धेकांची concept design योग्य आहे याची खातरजमा करण्याचे तांत्रिक ज्ञान व कौशल्य सार्वजनिक बांधकाम विभागाकडे असल्याने, याबाबत सार्वजनिक बांधकाम विभागाने उचित कार्यवाही करावी.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक २०२३०८१८१२०७५७७६०८ असा आहे. हा निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

HUSSEIN ALIMIYA MUKADAM

Digitally signed by HUSSEIN ALIMIYA MUKADAM
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=SCHOOL EDUCATION AND SPORTS DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=6ec81cd542d1ef02798f37eb2f964c23fcdfbd8b40c5378f934679289bc26def, pseudonym=E29B0A1C6FA02111A4C257C4FFD37B4E50FC9814, serialNumber=D1391C614871BB6E825B5F9341BD3AE559ABF68B1B3E47C8C1D8D13329CDB465, cn=HUSSEIN ALIMIYA MUKADAM
Date: 2023.08.18 12:09:51 +05'30'

**( हुसेन अ. मुकादम )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१) मा.मंत्री, उच्च व तंत्रशिक्षण यांचे खाजगी सचिव
२) प्रधान सचिव, उच्च व तंत्रशिक्षण यांचे स्वीय सहाय्यक.
३) प्रधान सचिव, सार्वजनिक बांधकाम यांचे स्वीय सहायक

४) मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम, प्रादेशिक विभाग, मर्झबान पथ, मुंबई

५) मुख्य वास्तुविशारद, सार्वजनिक बांधकाम विभाग, मर्झबान पथ, मुंबई

६) अधिक्षक अभियंता, सार्वजनिक बांधकाम, प्रादेशिक विभाग, मर्झबान पथ, मुंबई

७) श्रीम. उषा मंगेशकर, १०१,प्रभुकुंज, पेडर रोड, मुंबई ४०००२६.

८) संचालक, कला संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई.

९) प्राचार्य, सर ज.जी. वास्तुशास्त्र महाविद्यालय, मुंबई

१०) निवड नस्ती.